**सन २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२, २०२२-२३ करिता कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड पुरस्कार प्रदान करून व्यक्ती/संस्था यांचा सन्मान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बैठक-२०१९/प्र.क्र. १००/समन्वय**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०७ मार्च, २०२४.

**वाचा :** १. शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक, सकीर्ण-२०००/प्र.क्र.३०८/मावक-१, दि.०९/१०/२००१
२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. पुरस्कार-२०१७/प्र.क्र.२१/ विघयो, दि. ३ मार्च, २०१७.

**प्रस्तावना:**

कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड यांनी रुढी परंपरेविरुध्द व अस्पृश्यतेविरुध्द सामाजिक चळवळ उभारली. भूमीहीन शेतमजूर व कामगारांसाठी देशात अनेक ठिकाणी सत्याग्रह केले. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत त्यांचा सिंहाचा वाटा होता. तसेच त्यांनी पुरोगामी महाराष्ट्र घडविण्यामध्ये अत्यंत मोलाची कामगिरी केली. हे कार्य विचारात घेऊन, शासनाने दि. १५/१०/२००२ पासून दरवर्षी कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड यांच्या नावाने एक व्यक्ती व एक संस्था यांना पुरस्कार देण्याचे जाहिर केले आहे. कोणतीही व्यक्ती /संस्था एकाच वेळी दोन पुरस्कार मिळण्यासाठी पात्र नसेल. त्यानुषंगाने सदर पुरस्कारासाठी मा. मुख्यमंत्री तथा मा. मंत्री, सामाजिक न्याय यांच्या अध्यक्षतेखालील गठीत केलेल्या राज्यस्तरीय समितीने निवड केलेल्या व्यक्तीं/संस्था यांना सन २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२ व २०२२-२३ या वर्षांकरिता कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड पुरस्कार प्रदान करून त्यांचा सन्मान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २०१९-२०, २०२०-२१,२०२१-२२ व २०२२-२३ करीता कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड पुरस्कार प्रदान करण्यासाठी पुरस्कारार्थी व्यक्ती /संस्था यांची मा. मुख्यमंत्री तथा मा. मंत्री, सामाजिक न्याय यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय समितीने सदर शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट “अ” व “ब” मध्ये वर्षनिहाय नमूद केल्यानुसार निवड केली आहे. त्यानुषंगाने सदर व्यक्ती/ संस्था कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड पुरस्कार प्रदान करून सन्मानित करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. पुरस्कारासाठी निवडलेल्या व्यक्ती/संस्था पुरस्काराबाबत विहित केलेल्या अटी व शर्ती बाबतचे निकष पूर्ण करीत आहेत तसेच निवड केलेल्या पुरस्कारार्थी व्यक्ती हयात असून संस्था कार्यरत आहेत या अटीच्या अधीन राहून सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर पुरस्काराकरीता निवड करण्यात आलेल्या व्यक्ती/संस्था यांना पुरस्कार वितरीत करण्याकरीता पुरस्कार वितरण कार्यक्रम आयोजित करण्याची जबाबदारी आयुक्त, समाज कल्याण पुणे यांच्यावर सोपविण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०७१९०९०३९६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAVINDRA SHIVAJI GORVE

Digitally signed by RAVINDRA SHIVAJI GORVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=1cf45fecc49d779b77cc40d48a47afd9acce3cf6f847a274fe9ee5ec9ed23094, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5BF9529B988B3F5AE0952D00630DA49F825A8ED30F32967CC2872941AFCC0742, cn=RAVINDRA SHIVAJI GORVE
Date: 2024.03.08 09:58:38 +05'30'

(रविंद्र गोरवे)
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अ.मु.स., मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव,मुंबई
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा) (लेखा अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
१०. सर्व विभागीय आयुक्त,
११. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. सर्व जिल्हाधिकारी,
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१५. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
१६. सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग
१७. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हापरिषद
१८. सर्व संबंधित व्यक्ती / संस्था.
१९. निवड नस्ती / समन्वय.

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक: बैठक-२०१९/प्र.क्र. १००/समन्वय
दिनांक : ०७ मार्च, २०२४

परिशिष्ट “अ”

कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड पुरस्कार सन २०१९-२० साठी निवड केलेल्या व्यक्ती

| अ. क्र. | जिल्हा | व्यक्तीचे पूर्ण नाव व पत्ता |
|---|---|---|
| १. | छत्रपती संभाजीनगर | श्री. धोंडिरामसिंह धन्नुसिंह राजपूत, रा. देशपांडे गल्ली वैजापूर, जिल्हा छत्रपती संभाजीनगर |

कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड पुरस्कार सन २०२०-२१ साठी निवड केलेल्या व्यक्ती

| अ. क्र. | जिल्हा | व्यक्तीचे पूर्ण नाव व पत्ता |
|---|---|---|
| १. | लातूर | श्री. वैजनाथ साधू डावळे रा. मीलिंद नगर, खडक हनुमान लातूर |

कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड पुरस्कार सन २०२१-२२ साठी निवड केलेल्या व्यक्ती

| अ. क्र. | जिल्हा | व्यक्तीचे पूर्ण नाव व पत्ता |
|---|---|---|
| १. | लातूर | श्री. शामराव रावण सूर्यवंशी रा. बोकनगाव ता. जि. लातूर |

कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड पुरस्कार सन २०२२-२३ साठी निवड केलेल्या व्यक्ती

| अ. क्र. | जिल्हा | व्यक्तीचे पूर्ण नाव व पत्ता |
|---|---|---|
| १. | अकोला | श्री. भिमराव जामाजी घनबहाद्दूर, वरुळ जाउळका, अकोट जि. अकोला |

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक: बैठक-२०१९/प्र.क्र. १००/समन्वय
दिनांक : ०७ मार्च, २०२४

परिशिष्ट "ब"

कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड पुरस्कार सन २०१९-२० साठी निवड केलेल्या संस्था

"निरंक"

कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड पुरस्कार सन २०२०-२१ साठी निवड केलेल्या संस्था

"निरंक"

कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड पुरस्कार सन २०२१-२२ साठी निवड केलेल्या संस्था

| अ. क्र. | जिल्हा | संस्थेचे नाव व पत्ता |
|---|---|---|
| १. | लातूर | क्रांतीसूर्य बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, हाडगा, ता. निलंगा जि. लातूर |

कर्मवीर पद्मश्री दादासाहेब भाऊराव कृष्णराव गायकवाड पुरस्कार सन २०२२-२३ साठी निवड केलेल्या संस्था

"निरंक"